मौजे गलगले (ता.कागल, जि.कोल्हापूर ) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
**शासन निर्णय क्रमांकः पापुयो - २०१८/प्र.क्र. ९८/पापु १७**
**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मुंबई-४०० ०३२**
**तारीखः १६ ऑगस्ट, २०१८.**

**वाचा -**

१) ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती, मौजे गलगले, ता.कागल, जि.कोल्हापूर यांचे प्रशासकीय मंजूरी आदेश दिनांक ०१/०५/२०११.
२) अधीक्षक अभियंता, भारत निर्माण समन्वय व संनियंत्रण कक्ष, पुणे यांचे मुळ तांत्रिक मान्यता आदेश दिनांक ०६/०८/२०११.
३) शासन पत्र क्रमांक पापुयो-२४१७/प्र.क्र. १४५/पापु-१७, दिनांक २४/११/२०१७.
४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांचे सुधारीत तांत्रिक मान्यता आदेश दिनांक २६/०४/२०१८.
५) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांचे पत्र जा.क्र. कोजिप/ ग्रापापुवि/ कावि/६/१४१५/सुधारीत, दिनांक. ०२/०५/२०१८.

**शासन निर्णय :-**

मौजे गलगले (ता. कागल, जि. कोल्हापूर) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्रमांक १ येथील आदेशान्वये ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती, मौजे गलगले, ता.कागल, जि. कोल्हापूर यांनी मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. संदर्भ क्रमांक २ अन्वये अधीक्षक अभियंता, भारत निर्माण समन्वय व संनियंत्रण कक्ष, पुणे यांनी अंदाजपत्रकास मुळ तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. तथापी सदर योजनेच्या कामाच्या जादा दराच्या निविदा प्राप्त झाल्यामुळे खर्चात वाढ झाली. सदर योजनेच्या कामाच्या जादा दराच्या निविदेस संदर्भ क्र. ३ अन्वये कार्योत्तर मंजूरी देण्यात आली आहे. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांनी संदर्भ क्र. ४ अन्वये प्रस्तुत योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारीत तांत्रिक मान्यता दिली आहे. त्यानुसार, कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव

संदर्भाधिन पत्र क्र.५ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

**मौजे गलगले (ता. कागल, जि. कोल्हापूर) येथील** नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु. ६६,३०, ५५८/- (ढोबळ) (अक्षरी रुपये सहासष्ट लक्ष तीस हजार पाचशे अठ्ठावन फक्त)** एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे ३ महिन्यात पूर्ण करावीत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, कोल्हापूर यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

०२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु. ५,९२,५५८/- (अक्षरी रुपये पाच लक्ष ब्याण्णव हजार पाचशे अठ्ठावन फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

०३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१४१५२४४००५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Adhikrao Bapu Budhe

Digitally signed by Adhikrao Bapu Budhe
DN: CN = Adhikrao Bapu Budhe, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2018.08.18 10:48:39 +05'30'

( अ.बा.बुधे )
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता.
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधान परिषद.

४) मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६) जिल्हाधिकारी, कोल्हापूर
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर
८) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
९) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
१०) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे.
१२) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सांगली.
१३) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१४) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
१५) वरिष्ट भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, कोल्हापूर.
१०) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, कोल्हापूर
११) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, कोल्हापूर.
१२) अतिरिक्त मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३) प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१३,१८ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१५) निवड नस्ती कार्यासन पापु-१७.